सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः टंचाई** २०१४/**प्र.क्र.**५२/**पापु** १४

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**तारीखः ३१ मार्च, २०१५**

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु १४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.

२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई २००८/प्र.क्र. १४९/पापु १४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९.

३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र. २१२/पापु १४ दिनांक ८.५.२०१२

४) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र. ४१८/पापु १४, दिनांक ४.१.२०१४

५) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र.४८/पापु १४, दिनांक ६.५.२०१४

६) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक १२.०५.२०१४, २९.५.२०१४, ३०.६.२०१४, ५.७.२०१४, २२.७.२०१४ १०.११.२०१४, २४.११.२०१४, १२.१२.२०१४ १५.१२.२०१४, १६.१२.२०१४,१२.१.२०१५ व दिनांक २७.२.२०१५ चे शासन निर्णय

७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय-०४/२०१३/प्र.क्र. ७७/म-११, दिनांक ८.५.२०१४

८) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय-०५/२०१४/प्र.क्र. ५८/म-११, दिनांक ५.७.२०१४, दिनांक ९.१२.२०१४,

९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय-०५/२०१४/प्र.क्र. ५८/म-११, दिनांक दिनांक ३.१.२०१५ व दिनांक २६.२.२०१५

१०) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक विआका/विकास/अ.का./कावि-१०५/२०१५, दिनांक १०.३.२०१५ चे पत्र व प्रस्ताव

११) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१५/प्र.क्र. १९/पापु १४, दिनांक १६ मार्च, २०१५

**प्रस्तावना -**

ग्रामीण व नागरी पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष "२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. महसूल व वन विभागाने सन २०१४-१५ या चालू वित्तीय वर्षात महसूल व वन विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील उपलेखाशिर्ष २२४५ २१८५ अंतर्गत वर्ग केलेल्या रु. ६५००.०० लक्ष (रु. पासष्ट कोटी फक्त) पैकी रु. ६१५०.५१ लक्ष (रु. एकसष्ट कोटी पन्नास लाख एकावन्न हजार फक्त) इतका निधी संबंधित विभागीय आयुक्तांना वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित रु. ३४९.४९ लक्ष इतका निधी वित्त विभागाच्या आदेशानुसार महसूल व वन विभागास या विभागाद्वारे समर्पित करण्यात आलेला आहे. तसेच, महसूल व वन विभागाने दिनांक ५.७.२०१४, दिनांक ९.१२.२०१४,दिनांक ३.१.२०१५ व दिनांक २६.२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये उपलेखाशिर्ष २२४५ ००९३ अंतर्गत रु. १६९.६६ लक्ष (रु. एकशे एकोणसत्तर कोटी सहासष्ट लक्ष फक्त) इतका या विभागाकडे वर्ग केलेला होता. त्यापैकी रु.२०.०० कोटी इतका निधी महसूल व वन विभागास समर्पित करण्यात आला आहे. उर्वरित निधी सर्व संबंधित विभागीय आयुक्तांना वितरीत करण्यात आला आहे. सदर निधीपैकी विभागीय आयुक्त, नागपूर यांनी रु.७३.३१ लक्ष इतका निधी या विभागास समर्पित केला असून सदर निधी खांबोरा प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, जिल्हा अकोला या योजनेवरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस वितरीत करावयाची बाब संदर्भ क्र.१० व ११ च्या अनुषंगाने वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण/नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहित केलेल्या निकषानुसार खांबोरा प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेवरील रु. ९४.६६ लक्ष इतक्या रकमेची तातडीची पाणी पुरवठा योजना सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २०.२.२०१५ च्या बैठकीत मंजूर करण्यात आली आहे. सदर योजनेवरील खर्च भागविण्यासाठी रु. ७३.३१ लक्ष (रु. त्र्याहत्तर लक्ष एकतीस हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, अकोला, यांना संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे. उर्वरित निधी योजना पूर्ण व कार्यान्वित झाल्यानंतर वितरीत करण्यात येईल.

जिल्हाधिकारी यांच्याकडे सोपविलेल्या निधीचा विनियोग करतांना सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याचा त्याच प्रयोजनासाठी वापर होत आहे तसेच निधीचे वाटप करतांना संबंधित कामासाठी पूर्वी निधी वितरित करण्यात आला नाही याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त यांनी शासनाकडे दर महिन्यास

मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरित करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिकाऱ्याने घ्यावी. वितरित करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

याबाबतचा खर्च "मागणी क्र. सी-६, २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१ - अवर्षण, १०२ - पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१) - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या उपलेखाशीर्षामध्ये भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार अधिकारी यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या व बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लीपमध्ये गौण/उपलेखाशिर्षाचा संगणक सांकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा.

हे आदेश, वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८३/२०१४/व्यय-९, दिनांक ७.५.२०१४ व अनौपचारिक संदर्भ क्र.३७४/२०१४/व्यय-९, दिनांक ५.७.२०१४ अन्वये संदर्भ क्र.६ व्दारे वितरीत केलेल्या निधीतून पुर्नविनियोजनाव्दारे सदर निधी उपलब्ध करुन देण्याकरिता हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११५५४४०४०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.31 20:18:02 +05'30'

**(म. भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
९. उप सचिव /पापु-१४, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
१०. विभागीय आयुक्त, अमरावती.
११. पापु - १४ संग्रहासाठी